# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग

शासन ज्ञापन क्र. दुरुस्ती-०११९/प्र.क्र.२३६/पोल-७.
मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक १८ डिसेंबर २०१९.

**विषय** :- महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक, येथे ४०० मी. लांब *"Synthetic Track"* तयार करण्यासाठी प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

**संदर्भ** :-
1) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
2) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
3) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दिनांक २०.०९.२०१९.
4) शासन परिपत्रक, सा.बां. विभाग, क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा.-२, दिनांक २५.०९.२०१९.
5) पोलीस महासंचालक, म.रा., यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/ २८/ ६९०९/ एमएसपीजी-नाशिक/ ७२/ २०१९, दिनांक २९.११.२०१९.

**ज्ञापन.**-

पोलीस महासंचालक, म.रा., यांनी महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक, येथे ४०० मी. लांब *"Synthetic Track"* तयार करण्यासाठी रु.४,९७,७५,७२८/- इतक्या खर्चाच्या अंदाजास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त खर्चाचे अंदाज हे उप विभागीय अभियंता, दक्षिण (सा.बां.) उप विभाग, नाशिक, यांनी सन २०१९-२० च्या राज्य ई-दरसूचीनुसार तयार केले असून ते (१) कार्यकारी अभियंता, सा.बां. विभाग, नाशिक, (२) अधीक्षक अभियंता, सा.बां. मंडल, नाशिक, (३) मुख्य अभियंता, सा.बां. प्रदेश, नाशिक, व (४) संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. त्या अनुसार, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक, येथे ४०० मी. लांब *"Synthetic Track"* तयार करण्यासाठी रु.४,९७,७५,७२८/- *(रुपये चार कोटी, सत्त्याण्णव लक्ष, पंचाहत्तर हजार, सातशे अठ्ठावीस फक्त)* इतक्या खर्चाच्या अंदाजास, पुढील अटींवर, याद्वारे, प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

1) उक्त कामास सा.बां. विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मंजुरी प्राप्त करावी.
2) उक्त्ा कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग--मागणी क्रमांक बी-१, २०५५, पोलीस ००, १०९, जिल्हा पोलीस (००) (००)(०१), जिल्हा पोलीस बल (२०५५०१६८), (दत्तमत) (अनिवार्य), २७, लहान बांधकामे, या लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या

अनुदानातून भागविण्यात यावा. तथापि, उक्त लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्षात (सन २०१९-२०) मंजुर अनुदानातून खर्च करावयाचा आहे अशा, सक्षम प्राधिकाऱ्याने प्रशासकीय मान्यता प्रदान केलेल्या, कामांचे प्राथम्य ठरवावे आणि त्यानंतर उक्त कामासाठी १०० टक्के निधी उपलब्ध करता येईल असे स्पष्टपणे प्रस्थापित होत असेल तरच उक्त काम सुरु करावे.

४. हे शासन ज्ञापन, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच, अ.क्र.३ येथील वित्तीय शक्तीच्या बाबतीत प्रशासनिक विभाग या नात्याने गृह विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करुन सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. हे शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१९१२१८१२५३१९०८२९ असा आहे. हे शासन ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c6a6e7cad855fc787a96e36f11fbc87a9f66cfd9bad01184493f2735ad885627, postalCode=400032, street=2ND FLOOR,MANTRALAYA,MADAME CAMA MARG,MUMBAI, serialNumber=8538cd1e408948f7d025537d5f6589bd8958d1b95322e66d2cc5edf89ad0d79e, ou=HOME DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL GOPAL BORSE
Date: 2019.12.18 12:57:40 +05'30'

(स्वप्नील गोपाल बोरसे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,
पोलीस महासंचालक,
महाराष्ट्र राज्य, मुंबई.

प्रत-

१) संचालक, महाराष्ट्र पोलीस अकादमी, नाशिक.
२) मुख्य अभियंता, सा.बां. प्रदेश, नाशिक.
३) अधीक्षक अभियंता, सा.बां. मंडल, नाशिक.
४) कार्यकारी अभियंता, सा.बां. विभाग, नाशिक.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
७) कार्यासन अधिकारी (इमा.-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) कार्यासन अधिकारी (व्यय-७/विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) निवड फाईल (पोल-७).